सीपीटीपी -५ व ६ करिता परिविक्षाधीन पोलीस उप अधीक्षक/ सहायक पोलीस आयुक्त (नि:शस्त्र) संवर्गाची अधिसंख्य पदांना मुदतवाढ देणे.

महाराष्ट्र शासन
गृह विभाग
शासन निर्णय क्रमांक : रापोसे -२२१९/प्र.क्र.२०१/पोल-१अ
दुसरा मजला, मुख्य इमारत, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई- ४०० ००१.
दिनांक : ०९ नोव्हेंबर, २०२१

वाचा :-

१) सामान्य प्रशासन विभाग पत्र क्र. टिआरएन-०९२१/प्र.क्र.२३/सीपीटीपी-अ, दि.११ ऑक्टोबर,२०२१
२) गृह विभाग, शासन निर्णय क्र. रापोसे -२२१९/प्र.क्र.२०१/पोल-१अ, दि. ०२ डिसेंबर,२०१९

प्रस्तावना :-

महाराष्ट्र लोकसेवा आयोगामार्फत राज्यसेवा परीक्षा - २०१७ व २०१८ द्वारे निवड झालेल्या उमेदवारासाठी सामान्य प्रशासन विभागाने एकत्रित परिविक्षाधीन प्रशिक्षण कार्यक्रम- ५ व ६ दि. ०४ ऑक्टोंबर, २०१९ पासून यशदा, पुणे येथे आयोजित करण्यात आलेला आहे. गृह विभाग, शासन निर्णय क्र. रापोसे -२२१९/प्र.क्र.२०१/पोल-१अ, दि. ०२ डिसेंबर,२०१९ द्वारे एकत्रित परिवीक्षाधीन प्रशिक्षण कार्यक्रम-५ मध्ये प्रशिक्षणाकरिता रुजू झालेल्या परिवीक्षाधीन पोलीस उप अधीक्षक/सहायक पोलीस आयुक्त (नि:शस्त्र) यांच्याकरिता दिनांक ३०.०९.२०१९ पासून पुढील दोन वर्षांसाठी "पोलीस उप अधीक्षक/सहायक पोलीस आयुक्त (नि:शस्त्र)" या संवर्गातील पाच अधिसंख्य पदे निर्माण करण्यास मान्यता देण्यात आली होती व एकत्रित परिविक्षाधीन प्रशिक्षण कार्यक्रम (सीपीटीपी)-६ मध्ये प्रशिक्षणाकरिता रुजू झालेल्या परिवीक्षाधीन पोलीस उप अधीक्षक/सहायक पोलीस आयुक्त (नि:शस्त्र) यांच्याकरिता दिनांक ०२.१०.२०१९ पासून पुढील दोन वर्षांसाठी "पोलीस उप अधीक्षक/सहायक पोलीस आयुक्त (नि:शस्त्र)" या संवर्गातील तीन अधिसंख्य पदे निर्माण करण्यास मान्यता देण्यात आली होती.

सीपीटीपी-५ व सीपीटीपी-६ या तुकडीचे प्रशिक्षण दि.४.१०.२०१९ ते दि.३.१०.२०२१ या कालावधीत पूर्ण झाले आहे. सदर तुकडीमधील प्रशिक्षणार्थी परिविक्षाधीन अधिकारी खातेनिहाय जिल्हासंलग्नतेच्या प्रशिक्षणासाठी वाटप केलेल्या जिल्ह्याच्या ठिकाणी कार्यरत आहेत. सीपीटीपी-५ व सीपीटीपी-६ मधील गट-अ संवर्गातील प्रशिक्षणार्थी परिविक्षाधीन अधिकाऱ्यांचा सत्र-३ व सत्र-४ च्या परीक्षेचा निकाल अद्याप जाहिर झालेला नाही. सदर निकाल जाहिर होऊन संबंधित प्रशिक्षणार्थींची सेवाज्येष्ठता निश्चित करण्यासाठी काही कालावधी लागण्याची शक्यता आहे, ही बाब विचारात घेता सीपीटीपी-५ व सीपीटीपी-६ मधील गट-अ प्रशिक्षणार्थी परिविक्षाधीन अधिकारी सद्यस्थितीत ज्या ठिकाणी खातेनिहाय जिल्हा संलग्नतेचे प्रशिक्षण घेत आहेत त्या ठिकाणी त्यांना विभागीय संवर्ग वाटप होईपर्यंत कार्यरत ठेवणे आवश्यक आहे. उक्त वस्तुस्थिती विचारात घेता सीपीटीपी-५ व ६ मधील गट-अ प्रशिक्षणार्थी परिविक्षाधीन अधिकाऱ्यांसाठी सेवाज्येष्ठतेनुसार संवर्गवाटप होईपर्यंत त्यांच्या अधिसंख्य पदांना मुदतवाढ देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

शासन निर्णय :-

प्रस्तावनेत नमूद केलेली वस्तुस्थिती विचारात घेता, एकत्रित परिविक्षाधीन प्रशिक्षण कार्यक्रम (सीपीटीपी)-५ मध्ये परिविक्षाधीन पोलीस उप अधीक्षक/सहायक पोलीस आयुक्त (नि:शस्त्र) या पदाच्या

प्रशिक्षणाकरिता रूजू झालेल्या प्रशिक्षणार्थ्यांकरिता, सातव्या वेतन आयोगानुसार, वेतन स्तर S२० रू. ५६,०००/- ते रू. १,७७,५००/- (सहाव्या वेतन आयोगानुसार रू. १५६०० - ३९१०० + ग्रेड पे रू.५४००/-) या वेतनश्रेणीतील "पोलीस उप अधीक्षक/सहायक पोलीस आयुक्त (नि:शस्त्र)" या संवर्गाची निर्माण केलेल्या एकूण ५ अधिसंख्य पदांना दि. ३० सप्टेंबर, २०२१ पासून दोन महिने मुदतवाढ या शासन निर्णयान्वये देण्यात येत आहे.

**०२.** तसेच, एकत्रित परिविक्षाधीन प्रशिक्षण कार्यक्रम (सीपीटीपी)-६ मध्ये परिविक्षाधीन पोलीस उप अधीक्षक/सहायक पोलीस आयुक्त (नि:शस्त्र) या पदाच्या प्रशिक्षणाकरिता रूजू झालेल्या प्रशिक्षणार्थ्यांकरिता, सातव्या वेतन आयोगानुसार वेतन स्तर S२० रू. ५६,०००/- ते रू. १,७७,५००/- (सहाव्या वेतन आयोगानुसार रू. १५६०० - ३९१०० + ग्रेड पे रू.५४००/-) या वेतनश्रेणीतील "पोलीस उप अधीक्षक/सहायक पोलीस आयुक्त (नि:शस्त्र)" या संवर्गाची निर्माण केलेल्या एकूण ३ अधिसंख्य पदांना दि. ०२ ऑक्टोंबर, २०२१ पासून दोन महिने मुदतवाढ या शासन निर्णयान्वये देण्यात येत आहे.

**०३.** सदर उमेदवारांच्या प्रशिक्षण कालावधीमध्ये यशदा, पुणे या प्रशिक्षण संस्थेमध्ये प्रत्यक्ष उपस्थित उमेदवारांच्या संख्येनुसार वेतनाकरिता अग्रिम निधी या प्रशिक्षण संस्थेला उपलब्ध करून देण्याची कार्यवाही आणि उर्वरित प्रशिक्षण कालावधीमध्ये वेतन संबंधित उमेदवारांना अदा करण्याची कार्यवाही "महासंचालक व पोलीस महानिरीक्षक, महाराष्ट्र राज्य, मुंबई" आणि "संचालक, महाराष्ट्र पोलीस प्रशिक्षण अकादमी, नाशिक" यांनी सामान्य प्रशासन विभागाने वेळोवेळी दिलेल्या निदेशानुसार करावी.

**०४.** सदरहू उमेदवारांच्या प्रशिक्षणावर या दोन महिने वाढीव प्रशिक्षण कालावधीसाठी होणारा खर्च "२०५५-पोलीस १०९ (एक) (०१)- जिल्हा पोलीस दल" या लेखाशिर्षांतर्गत "वेतन" या उद्दिष्टाखालील मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

**०५.** हा शासन निर्णय वित्त विभाग शासन निर्णय क्र. पदनि-२०१६/प्र.क्र.०७/१६/वित्तीय सुधारणा-१, दि. २० फेब्रुवारी, २०१६ नुसार प्रशासकीय विभागास प्रदान केलेल्या अधिकारांतर्गत निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२१११०९१५२९५९०५२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने,

VENKATESH BHAT

Digitally signed by VENKATESH BHAT
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HOME DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=5f0272b97156a5d2812bad6725ca46fb2671d1da08208cfdd6677fac0afd6bf2, pseudonym=48D2A00BD54D7705C239CA2A5785A87EDE4514EC, serialNumber=6E277C9088A4CB8853E535A4642A6800B908C5DBDB3A63175760874EBA717AE1, cn=VENKATESH BHAT
Date: 2021.11.09 15:34:02 +05'30'

**( व्यंकटेश भट )**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई.

२. महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता/लेखापरीक्षा)-१, महाराष्ट्र, मुंबई.
३. महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता/लेखापरीक्षा)-२, महाराष्ट्र, नागपूर.
४. अपर पोलीस महासंचालक (प्रशिक्षण व खास पथके), महाराष्ट्र राज्य, मुंबई.
५. अपर पोलीस महासंचालक(आस्थापना), महाराष्ट्र राज्य, मुंबई.
६. महासंचालक, यशदा, राजभवन आवार, बाणेर रोड, पुणे.
७. संचालक, महाराष्ट्र पोलीस अकादमी, नाशिक.
८. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
९. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
१०. जिल्हा कोषागार अधिकारी (सर्व)
११. सामान्य प्रशासन विभाग कार्यासन -८ व सीपीटीपी-अ, मंत्रालय, मुंबई.
१२. सहसंचालक, लेखा व कोषागारे, संगणक कक्ष, नवीन प्रशासकीय भवन, ५ वा मजला, मुंबई.
१३. वित्त विभाग (कार्यासन व्यय-७ व वित्तीय सुधारणा-१), मंत्रालय, मुंबई.
१४. निवडनस्ती (कार्यासन पोल-१अ).